आहरण व संवितरण अधिकारी तसेच
**नियंत्रक अधिकारी घोषित करणेबाबत.....**

# महाराष्ट्र शासन

## आदिवासी विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२४/प्र.क्र.०२/ कार्यासन-६**

विस्तार इमारत, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख: ०९ ऑगस्ट, २०२४

**प्रस्तावना :-**

वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रम अंतर्गत केलेल्या जाहिरात व प्रसिद्धीच्या कामासाठी प्रचलित कार्यपद्धतीनुसार आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक व आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून निधी वितरीत करण्यात येत आहे. परंतु माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई यांच्यामार्फत केलेल्या जाहिरात व प्रसिद्धीच्या कामांसाठी निधी वितरीत करण्यास व देयके अदा करण्यास अडचणी येत आहेत.

२. या पार्श्वभूमीवर आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत राबविण्यात येत असलेल्या **'जनजाति क्षेत्र उपयोजनेखाली नव्याने अंमलबजावणी करण्यात आलेल्या योजनांची विविध माध्यमांमार्फत माहिती व प्रसिद्धी'** या योजनेचे लेखाशिर्ष २२२५ ४११३ मधील २६, जाहिरात व प्रसिद्धी आणि ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टांतर्गत माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई यांच्यामार्फत केलेल्या कामांच्या निधी वितरणासाठी, तर निधीचे आहरण व संवितरण करण्यासाठी **'नियंत्रक अधिकारी'** आणि **'आहरण व संवितरण अधिकारी'** घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय** :-

**'जनजाति क्षेत्र उपयोजनेखाली नव्याने अंमलबजावणी करण्यात आलेल्या योजनांची विविध माध्यमांमार्फत माहिती व प्रसिद्धी'** या योजनेचे लेखाशिर्ष २२२५ ४११३ मधील २६, जाहिरात व प्रसिद्धी आणि ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टांतर्गत माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई यांच्यामार्फत करण्यात आलेल्या कामांच्या निधी वितरणासाठी सह/ उप सचिव (रोख शाखा), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना **'नियंत्रक अधिकारी'** तर निधीचे आहरण व संवितरणासाठी अवर सचिव (रोख शाखा), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना **'आहरण व संवितरण अधिकारी'** म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. हा शासन निर्णय महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ खंड-१ मधील नियम १५(३) व १५६ तसेच वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ भाग -पहिला, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०७१०२६५८९५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF728255A5EB0A0DD495EF82F989931088637D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2024.08.09 15:44:45 +05'30'

**(किरण कि. पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक
४. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
५. महालेखापाल (लेखापरिक्षण)/ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर
६. सह सचिव (रोख शाखा), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७. अवर सचिव (रोख शाखा), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई
१०.वित्त विभाग, वित्तीय सुधारणा/व्यय-१४/अर्थसंकल्प-७, मंत्रालय, मुंबई
११.कक्ष अधिकारी, कार्यासन-५, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.निवड नस्ती, कार्यासन-६, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई